**अर्थसंकल्पीय अनुदान २०१७-१८ मागणी क्र. वाय -०४, २७०२ , लहान पाटबंधारे भूजल संपत्तीचे अन्वेषण व विकास आस्थापना ( योजनेतर)**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-१६१७/प्र.क्र.१०८/ पापु-१५**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
लोकमान्य टिळक मार्ग , मुंबई -४०० ००१
तारीख: २९ एप्रिल, २०१७.

**वाचा -**

**शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३दिनांक १८.०४.२०१७**

**प्रस्तावना -**

"महाराष्ट्र विनियोजन विधेयक -२०१७"( महाराष्ट्र विनियोजन ( लेखानुदान) अधिनियम ,२०१७ यांच्या अनुसूचीच्या स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह) यास विधानमंडळाने मंजुरी दिली आहे. सदर विधेयकाचे अधिनियमात रुपांतर झाले असुन ते २०१७ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक -२६ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग ४, दि. १५ एप्रिल,२०१७ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले असल्याचे उपरोक्त परिपत्रकान्वये कळविण्यात आले आहे . वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. १८.०४.२०१७ च्या परिपत्रकान्वये पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास महाराष्ट्र विनियोजन अधिनियम , २०१७ अनुसार वित्तीय वर्ष २०१७-१८ च्या एकुण अर्थसंकल्पीय योजनांतर्गत व योजनेतर तरतुदींपैकी ८० टक्के निधी सन २०१७-१८ च्या प्रथम नऊ महिन्यांकरिता ( डिसेंबर २०१७ अखेर ) अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध करुन दिला असल्याचे कळविले आहे. तसेच योजनेतर व योजनांतर्गत भांडवली निधी वितरणाची मर्यादा १०० टक्के राहील असे पुढे नमूद करण्यात आले आहे.

२. सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या आस्थापनेचा खर्च भागविण्यासाठी "२७०२- लहान पाटबंधारे २७०२ ३९१८" या लेखाशीर्षाखाली एकूण रु.३६९२.०७ /-लाख इतकी तरतूद करण्यात आली आहे. वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकानुसार प्रथम नऊ ( डिसेंबर २०१६ अखेर ) महिन्यांचा एकूण तरतूदीच्या ८०% या मर्यादेपर्यंत आस्थापनाविषयक खर्च भागविण्यासाठी "२७०२- लहान पाटबंधारे २७०२ ३९१८" या लेखाशीर्षाखाली मंजूर झालेले लेखानुदान संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना उपलब्ध करुन देण्याची बाब विचाराधीन आहे.

## शासन निर्णय-

सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेच्या आस्थापना व इतर अनुषंगीक बाबींवरील माहे एप्रिल २०१७ ते डिसेंबर २०१७ या कालावधीपर्यंत खर्च भागविण्यासाठी पुढील विवरणपत्रात स्तंभ-४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे एकूणरु. ३६५७.१५६ /- लाख (रुपये ३६ कोटी, सत्तावन लाख ,पंधरा हजार सहाशे फक्त ) दत्तमत्त इतके अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांना या शासन निर्णयाव्दारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

( रुपये- लाखात)

| अ.क्र. | उपशीर्ष | सन २०१७-१८ करिता मंजूर तरतूद | माहे एप्रिल ते डिसेंबर २०१७ या नऊ महिन्यांसाठी ८० % मर्यादेपर्यत वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेले अनुदान |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ०१-वेतन | ३४९८.२९ | ३४९८.२९ |
| २ | ०३ -अतिकालीक भत्ता | ५.८९ | ४.७१२ |
| ३ | ०६ -दुरध्वनी ,वीज देयके | ३२.७४ | ३२.७४ |
| ४ | ११- देशांतर्गत प्रवास खर्च | ६६.०० | ५२.८० |
| ५ | १३ -कार्यालयीन खर्च | ३५.६६ | २५.८२ |
| ६ | १४ भाडे -,पट्टी व कर | ३४.९० | २७.९२ |
| ७ | १७संगणकावरील खर्च- | १.४५ | १.१६ |
| ८ | २० इतर प्रशासकीय खर्च - | ०.०१ | ०.०१ |
| ९ | २४- पेट्रोल ,तेल, वंगण | ४.२१ | ३.३६८ |
| १० | ५१ -मोटार वाहने | १२.९२ | १०.३३६ |
| **एकुण दत्तमत** | | **३६९२.०७** | **३६५७.१५६** |

सदर खर्च मागणी क्र. वाय-४ , लेखाशीर्ष “ २७०२ लहान पाटबंधारे, ०२- भूजल ००५- अन्वेषण (०१) (०१) भूजल संपत्तीचे अन्वेषण व विकास आस्थापना (योजनेतर) २७०२ ३९१८” या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा . संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा , पुणे यांनी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या मासिक तरतूदीतून ( Monthly Cash Flow) भागविण्यात यावा . सदर निधी वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. १८.०४.२०१७ च्या परिपत्रकातील तरतूदींच्या अधीन राहुन वितरीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२९१०३०२८३१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Kirti Bhargav Mohite

Digitally signed by Kirti Bhargav Mohite
DN: CN = Kirti Bhargav Mohite, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply And Sanitation Department
Date: 2017.04.29 12:01:10 +05'30'

**(कीर्ती मोहिते)**
कार्यासन अधिकारी

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सर्व
३. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सर्व
४. उप अभियंता ( यां) , भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सर्व
५. महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई /२- नागपूर ( लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता )
६. वित्त विभाग, अर्थसंकल्प १६ ( २ प्रती)
७. कक्ष अधिकारी / लेखा अधिकारी पापु-०४, पापु-२०
८. निवड नस्ती पापु-१५